राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत सन २०२१-२२ च्या प्रकल्प अंमलबजावणी आराखडा आयुष्यमान भारत योजनेंतर्गत आरोग्यवर्धिनी कार्यक्रमासाठी टेलिकन्सलटेशन सुविधा सुरु करण्यासाठी विविध तांत्रिक उपकरणे खरेदीसाठी प्रशासकिय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.४२/आरोग्य-७**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०७ जानेवारी, २०२२.

वाचा :-

१. सह संचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक. राआसो/आ.टेलि/टेलिमेडिसीन/१०६४८७-४९८/२०२१-२२, दिनांक २२.१२.२०२१.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मान्यता प्राप्त टिप्पणी, दिनांक १७.१२.२०२१.

प्रस्तावना:-

आयुष्यमान भारत योजने अंतर्गत सन २०१९-२० मध्ये आरोग्यवर्धिनी केंद्र उपकेंद्र प्राथमिक आरोग्य केंद्र आणि शहरी भागातील प्राथमिक आरोग्य केंद्र) येथे टेलिकन्सल्टेशन सेवा सुरु करण्यात आली आहे. केंद्र शासनाने प्रसारीत केलेल्या मार्गदर्शक सुचनेनुसार हब आणि स्पोक या मॉडेलचा वापर करून टेलिकन्सल्टेशन सेवा सुरु करण्यात आली आहे. त्यानुषंगाने उपरोक्त संदर्भ क्र.१ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार सदर आरोग्यवर्धिनी कार्यक्रमांतर्गत सद्यस्थितीत एकूण ५४५३ केंद्रामध्ये टेलीकन्सलटेशन सुविधा प्रभावीपणे सुरु करण्यासाठी सन २०२१-२२ च्या मंजूर पी.आय.पी.मध्ये FMR Code १७.२.१ अंतर्गत संगणक, हेडफोन विथ माइक, एच डी वेब कॅमेरा आणि प्रिंटर कम स्कॅनर ही तांत्रिक उपकरणे ई-निविदा प्रक्रिया राबवून खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

आरोग्य सेवा आयुक्तालयाने प्रस्तावित केल्याप्रमाणे आयुष्यमान भारत योजनेंतर्गत आरोग्यवर्धिनी कार्यक्रमांतर्गत सद्यस्थितीत एकूण ५४५३ केंद्रामध्ये टेलीकन्सलटेशन सुविधा प्रभावीपणे सुरु करण्यासाठी सन २०२१-२२ च्या मंजूर पी.आय.पी.मध्ये FMR Code १७.२.१ अंतर्गत संगणक,

हेडफोन विथ माइक, एच डी वेब कॅमेरा आणि प्रिंटर कम स्कॅनर ही तांत्रिक उपकरणे ई-निविदा प्रक्रिया राबवून खरेदी करण्यासाठी प्रति उपकेंद्र रु.७०,०००/- प्रमाणे एकूण ५४५३ उपकेंद्रांकरीता एकूण रु.३८१७.१० लक्ष इतक्या रकमेस खालील अटींच्या अधीन राहून खरेदी प्रक्रिया राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर प्रशासकीय मान्यता ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर साधन सामुग्री/ तांत्रिक उपकरणांची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबीच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू साधन सामुग्री/ तांत्रिक उपकरणांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी तांत्रिक समिती / अधिकारी यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसावे तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) है विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले खातरजमा करण्यात यावी, पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबीच्या शांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबीचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क. भांखस-२०१५/प्र.क्र.८२/भाग उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत, त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार यांच्याकडील उपलब्ध असलेले न्युनतम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनतम दर निविदेकरीता मागणी नोंदवितांना साधन सामुग्री/ तांत्रिक उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे. त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/ Post dispatch random sample Inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी,

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) तसेच राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) अंतर्गत विविध लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर बाबींचा पुरवठा आदेश देण्यापूर्वी निधीची उपलब्धताही तपासून घेण्यात यावी.

८) तसेच या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र. समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्वता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी २०१६/प्र.क. २४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास

मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२११८०५४३७८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.07 12:33:50 +05'30'

**(वि. ल. लहाने)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) अधिक्षक, विभागिय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)